पुणे जिल्ह्यातील इंदापूर तालुक्यातील इतर जिल्हा मार्ग व ग्रामीण मार्ग रस्ते प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक बांधकाम विभाग
शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०२०/प्र.क्र.४३/नियोजन-२
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक- २२ जुन, २०२०.

पहावे :- १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांचे पत्र जा.क्र.मुअ(पुणे)/ का-२/रेशा/१२/५६३/२०२०, दि.१०/०२/२०२०.

प्रस्तावना :-

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांनी संदर्भाधिन पत्रान्वये पुणे जिल्ह्यातील इंदापूर तालुक्यातील इतर जिल्हा मार्ग व ग्रामीण मार्ग रस्ते प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करणेबाबत प्रस्ताव शासनास सादर केलेला आहे. तसेच जिल्हा परिषद, पुणे यांनी सदर रस्ते दर्जोन्नत करणेबाबत मागणी केलेली आहे.

सदर रस्त्यांवरील गावांची संख्या, लोकसंख्या, रस्त्यांचा होणारा वापर तसेच जिल्हा परिषद, पुणे यांचा ठराव विचारात घेता, सदर रस्ते प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत/समावेश करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

शासन निर्णय :-

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे यांचा प्रस्ताव व जिल्हा परिषद, पुणे यांचा ठराव विचारात घेऊन पुणे जिल्ह्यातील खालील रस्ते दर्जोन्नत/समावेश करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | प्रस्तावित रस्त्याचे नांव | सामाविष्ठ रस्त्याचा क्रमांक | साखळी क्रमांक व लांबी | दर्जोन्नत करावयाची एकूण लांबी (कि.मी.) | दर्जोन्नती नंतरचा क्रमांक |
|---|---|---|---|---|---|
| १. | प्रजिमा ६१ निंबोडी ते शेटफळगडे रा.मा.५४ म्हसोबावाडी लाकडी काझड बोरी लासुर्णे रस्ता. | ग्रामीण मार्ग ३२६ | (०/००ते १/७००) १.७०० कि.मी. | २१.५०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-१६७ |
| | | ग्रामीण मार्ग ३९ | (०/००ते २/६००) २.६०० कि.मी. | | |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | ग्रामीण मार्ग १११ | (०/००ते ५/००) ५.०० कि.मी. | | |
| | | इतर जिल्हा मार्ग १९४ | (०/००ते १२/२००) १२.२०० कि.मी. | | |
| २. | रा.म.क्र. ६५ पळसदेव मरडवाडी बोरी रस्ता. | इतर जिल्हा मार्ग १९८ | (०/०० ते १९/८००) १९.८०० कि.मी. | १९.८०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-१६८ |
| ३. | प्रजिमा १५९ पासून वरकुटे खु. वडापुरी गलांडवाडी नं.२ सरडेवाडी ते रा.म.क्र.६५ पर्यंत रस्ता. | इतर जिल्हा मार्ग २०१ | (०/०० ते १६/८००) १६.८०० कि.मी. | १६.८०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-१६९ |
| ४. | रा.मा.१३२ ते बोरी येसुपारवाडी शेळगांव रस्ता. | इतर जिल्हा मार्ग २०३ | (०/०० ते १२/८००) १२.८०० कि.मी. | १२.८०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-१७० |
| ५. | पळसदेव माळवाडी भावडी बरकुटे बु. करेवाडी प्रजिमा १५९ पर्यंतचा रस्ता. | इतर जिल्हा मार्ग २०६ | (०/०० ते १६/७००) १६.७०० कि.मी. | १६.७०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-१७१ |
| ६. | कळस शेळगाव रस्ता ते हॅपी इंडिया कारखाना गोसावीवाडी विठ्ठलवाडी रा.म.क्र.६५ ला मिळणारा रस्ता. | ग्रामीण मार्ग २४५ | (०/००ते १०/००) १०.०० कि.मी. | १०.०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-१७२ |
| ७. | रा.मा.१२१ अंथुर्णे भरणेवाडी ते बिरंगुडवाडी रस्ता. | ग्रामीण मार्ग ७५ | (०/००ते १०/००) १०.०० कि.मी. | १०.०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग-१७३ |
| ८. | प्रजिमा ७२ ते आडोबावस्ती निंबाळकरवस्ती नरसिंहपूर रस्ता प्रजिमा क्र.१२१ मध्ये समाविष्ट करणेबाबत. | ग्रामीण मार्ग ३२ | (०/०० ते ६/००) ६.०० कि.मी. | ६.०० कि.मी. | सदर रस्ता प्र.जि.मा. १२१ मध्ये समाविष्ट केल्याने प्र.जि.मा. १२१ ची लांबी (४९.६००+ ६.००) ५५.६०० कि.मी. इतकी होईल. **नामाभिधान** निमगांवकेतकी पिटकेश्वर सराफवाडी |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | | | | निरवांगी खोरोची चाकाटी सराटी लुमेवाडी पिप्री टण्णू ते रा.मा.१२० आडोबावस्ती निंबाळकरवस्ती नरसिंहपूर रस्ता असे होईल. (०/०० ते ५५/६००) |
| | **एकूण** | | | **११३.६०० कि.मी.** | |

परिणामी रस्ते विकास योजना २००१-२०२१ मधील पुणे जिल्ह्यातील प्रमुख जिल्हा मार्ग दर्जाच्या रस्त्यांच्या एकूण लांबीत **११३.६०० कि.मी.** ने वाढ होवून एकूण लांबी (४२८२.००+ ११३.६) म्हणजेच **४३९५.६०० कि.मी.** इतकी व इतर जिल्हा मार्ग रस्त्यांच्या एकूण लांबीत ७८.३०० **कि.मी.** ने घट होवून एकूण लांबी (२२४६.९८०-७८.३००) म्हणजेच **२१६८.६६ कि.मी.** इतकी तसेच ग्रामीण मार्ग रस्त्यांच्या एकूण लांबीत **३५.३०० कि.मी.** ने घट होवून एकूण लांबी (१००७७.७६-३५.३००) म्हणजेच **१००४२.४६ कि.मी.** इतकी होईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००६२६१५४८५६७६१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prashant Vinayakrao Patil

Digitally signed by Prashant Vinayakrao Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, cn=Prashant Vinayakrao Patil
Date: 2020.06.26 16:48:49 +05'30'

**(प्रशांत पाटील)**

अवर सचिव (नियोजन), महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, पुणे.

२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)

३) जिल्हाधिकारी, पुणे .

४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे.

५) अधिक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, पुणे. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.)

६) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (पूर्व) विभाग, पुणे.

७) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.

८) रेखाचित्र शाखा, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय.

९) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.

१०) निवडनस्ती.